**विभागीय वन अधिकारी गट-अ (वरिष्ठ श्रेणी) व सहायक वनसंरक्षक गट-अ (कनिष्ठ श्रेणी) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदलीने पदस्थापना देणे बाबत .**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग,**

**शासन आदेश क्रमांक : एमएफएस-२०२१/प्र.क्र. १४०/फ-८.**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २२ डिसेंबर, २०२१

**संदर्भः-** महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८ दि.१३/०९/२०१९ व दि. २१/०९/२०२१

**शासन आदेश :-**

संदर्भाधीन दि.१३/०९/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये वन विभागातील पदांचा सुधारीत आकृतीबंध मंजूर करण्यात आला आहे. तसेच सदर आकृतीबंधानुसार मंजूर पदांचे वनवृत्तनिहाय व शाखानिहाय पुर्नगठण दि.२१/०९/२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये करण्यात आले आहे. त्यामुळे वन विभागातील काही पदे निरसीत झाली आहेत. सदर निरसीत पदांमधील विभागीय वन अधिकारी गट-अ (वरिष्ठ श्रेणी) व सहायक वनसंरक्षक गट-अ (कनिष्ठ श्रेणी) संवर्गातील पदावर कार्यरत अधिकाऱ्यांना इतरत्र पदस्थापना देण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

२. त्यानुषंगाने शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियम आणि शासकीय कामे पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (४) व ४ (५) अंतर्गत तरतुदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निरसीत पदावर कार्यरत असणाऱ्या विभागीय वन अधिकारी गट-अ (वरिष्ठ श्रेणी) व सहायक वनसंरक्षक गट-अ (कनिष्ठ श्रेणी) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या खालीलप्रमाणे बदलीने पदस्थापना करण्यात येत आहेत. :-

| अ.क्र. | अधिका-यांचे नाव व पदनाम | बदलीने पदस्थापनेचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्रीमती स्नेहल बी. महानुर (स्नेहल मिलिंद पाटील), विभागीय वन अधिकारी (लेखापरिक्षण) प्रधान मुख्य वनसंरक्षक यांचे कार्यालय | विभागीय वन अधिकारी (रोहयो) प्रधान मुख्य वनसंरक्षक कार्यालय, नागपूर | रिक्त पदी |
| २ | श्री. मोहन बाबुराव नाईकवाडी, विभागीय वन अधिकारी (वन्यजीव) वनसंरक्षक (वन्यजीव-पूर्व) यांचे कार्यालय, नागपूर. | विभागीय वन अधिकारी (सर्वेक्षण व सनियंत्रण) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) नागपूर यांचे कार्यालय | रिक्त पदी |

| | | | |
|---|---|---|---|
| ३ | श्रीमती प्रिया दौलतराव मलवे, सहायक वनसंरक्षक (कार्य आयोजना-डाटाबेस), अपर प्रधान मुख्य वनसंक्षक (कार्य आयोजना-पूर्व) नागपूर | सहायक वनसंरक्षक (कक्ष-१४) वनसंरक्षक (कार्य आयोजना-पुर्व) नागपूर यांचे कार्यालय. | रिक्त पदी |
| ४ | श्रीमती निकीता जयराम चवरे, संलग्न अधिकारी तथा सहायक वनसंरक्षक (वन्यजीव), चंद्रपूर वन विभाग | सहायक वनसंरक्षक (तेंदू) चंद्रपूर. | रिक्त पदी |
| ५ | श्री. साहेबराव पाडूरंग पवार, सहायक वनसंरक्षक (तेंदू), आल्लापल्ली वन विभाग, आल्लापल्ली | सहायक वनसंरक्षक (संलग्न अधिकारी) भामरागड वन विभाग. | रिक्त पदी |
| ६ | श्रीमती प्रणीता नरेश पारधी, सहायक वनसंरक्षक (जंकास) कोन्झरी, यवतमाळ वन विभाग | सहायक वनसंरक्षक (जंकास) यवतमाळ वनवृत्त, यवतमाळ | रिक्त पदी |
| ७ | श्री. संजीव सवळाराम खंडारे , प्रकाष्ठ निष्कासन अधिकारी, पुसद वन विभाग, स्थित उमरखेड | सहायक वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण) वाशिम | रिक्त पदी |
| ८ | श्री. बाळु हरिचंद्र कोळगे , तत्का. सहायक वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, वन विभाग वर्धा, वनवृत्त नागपूर. | सहायक वनसंरक्षक, (अतिक्रमण निर्मुलन) हिंगोली, वन विभाग हिंगोली. | रिक्त पदी |
| ९ | श्री. नोवेल पाखरे , सहायक वनसंरक्षक-१, (सामजिक वनीकरण) बीड | सहायक वनसंरक्षक-१, (सामाजिक वनीकरण) औरंगाबाद | रिक्त पदी |
| १० | श्री. प्रशांत वरुडे , सहायक वनसंरक्षक-२, (सामाजिक वनीकरण) जालना | सहायक वनसंरक्षक-१, (सामाजिक वनीकरण) जालना | रिक्त पदी |
| ११ | श्री. भरत बाबुराव शिंदे , सहायक वनसंरक्षक (जंकास-१) पश्चिम नाशिक वन विभाग. | सहायक वनसंरक्षक-१, सामाजिक वनीकरण जळगांव | रिक्त पदी |
| १२ | श्री. के.बी. पांडे , उपसंचालक, शिक्षण-२, वन प्रशिक्षण संस्था, जालना | सहायक वनसंरक्षक (वन्यजीव), विभागीय वन अधिकारी यांचे कार्यालय, औरंगाबाद. | रिक्त पदी |

३. वरील बदलीने पदस्थापना दिलेल्या अधिकाऱ्यांना नियंत्रक अधिकाऱ्यांनी बदलीच्या पदावर हजर होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच, संबंधित अधिकाऱ्यांना बदलीच्या पदावर हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते बदलीच्या पदी कोणत्या दिनांकास हजर झाले, याबाबतची माहिती संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांनी शासनास ananda.shendge@nic.in या ई-मेल संकेतस्थळावर सादर करावी.

४. संबंधित अधिकाऱ्यांना शासनाच्या पूर्वपरवानगी शिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम १९८१ मधील नियम - ३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्याचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास, ते संबंधित अधिकाऱ्यांना मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत.

५. सदर बदली आदेशानुसार संबधित अधिकारी तात्काळ बदलीच्या पदावर हजर न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारे असल्यामुळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचेविरुद्ध शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

६. सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०२११२२२१७५६३९६६१९ असा आहे हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

ANANDA SHANKAR SHENDAGE

Digitally signed by ANANDA SHANKAR SHENDAGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0db7067f83b51744741b4485650edc8705560188be635df819605b4913ead056, pseudonym=F47821202A3D8C06F80E6240CB6E122AFEEDD6F5, serialNumber=DCED31BA3BA0E455430F67304905C6E3544DAE39602268D4CF2844818A1F80A4, cn=ANANDA SHANKAR SHENDAGE
Date: 2021.12.22 17:58:48 +05'30'

**(आनंदा शेंडगे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
२) मा.राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य,नागपूर.
४) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य,नागपूर.
५) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य,नागपूर.
६) प्रधान मुख्य वनसंरक्षक ,सामाजिक वनीकरण , महाराष्ट्र राज्य,पुणे.
७) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), नागपूर.
८) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव),प. नागपूर.
९) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक/वन्यजीव )/वनसंरक्षक (प्रादेशिक/वन्यजीव) (सर्व)
१०) वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण (सर्व)

११) वनसंरक्षक (वन्यजीव) (सर्व)

१२) महालेखापाल,महाराष्ट्र-१/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर

१३) जिल्हा कोषागार अधिकारी, (सर्व)

१४) प्रधान सचिव (वने) यांचे स्वीय सहाय्यक

१५) संबंधित अधिकारी ( प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), म.रा.नागपूर यांचे मार्फत)

१६) निवड नस्ती (फ-८ कार्यासन).